औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मांडवी, जिल्हा. मुंबई शहर या संस्थेच्या कार्यशाळा व प्रशासकीय इमारत बांधकामाच्या रु.८,१४,३८,५५४/- एवढया खर्चाच्या अंदाजपत्रकास मान्यता मिळणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**

उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय क्रमांक आयटीआय-२०१०/(१७०/१०)व्यशि-२अर्थसं,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक ११ ऑगस्ट, २०१०.

संदर्भ :- व्यवसाय प्रशिक्षण संचालनालयाचे पत्र क्र.१५/नुतनीकरण/२०१०/२३२, दि.२८.४.२०१०.

**प्रस्तावना :-** अल्पसंख्याक समाजामधील शिक्षणाचा अभाव आर्थिक कमकुवत स्थिती लक्षात घेऊन अल्पसंख्याक समाजातील उमेदवारांना रोजगार व स्वयंरोजगाराच्या संधी निर्माण करण्यासाठी अल्पसंख्याक विभागाने अल्पसंख्याकांसाठी औ.प्र.संस्था, मांडवी सुरु करण्यास मान्यता दिली आहे. सदर संस्थेत १. कोपा, २. इलेक्ट्रीक मेकॅनिक, ३. फॅशन टेक्नालॉजी, ४. इलेक्ट्रीशियन, ५.फिटर व ६. वेल्डर अशा ६ व्यवसायाचे प्रशिक्षण देण्यात येणार आहे. या संस्थेसाठी प्रशासकीय इमारत असणे आवश्यक आहे. त्यामुळे मांडवी या संस्थेसाठी सी.टी.सर्व्हे क्र.१५५९ मांडवी विभाग येथील अंदाजे ८८०.४३ चौ.मी.क्षेत्रफळ जागेचा ताबा दि.१९.१.२००९ रोजी घेण्यात आला आहे. प्राप्त भूखंडावर संस्थेसाठी कार्यशाळा व प्रशासकीय इमारत बांधकामाचे अंदाजपत्रक कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, वरळी,मुंबई-१८ यांचेकडून सन २००९-१० च्या दरसूचीवर आधारित करुन घेतलेले आहे. सदर अंदाजपत्रकास प्रशासकीय मंजूरी घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय -</u>** औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मांडवी,जिल्हा. मुंबई शहर या संस्थेच्या कार्यशाळा व प्रशासकीय इमारत बांधकामासाठी लागणा-या **रु. ८,१४,३८,५५४/- ( रुपये आठ कोटी चौदा लाख अडोतीस हजार पाचशे चौपन्न फक्त )** एवढया खर्चाच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

१. अंदाजपत्रक सन २००९-१० च्या मुंबई विभागाच्या दरसुचीवर आधारीत आहे.
२. प्रस्तुत इमारतीचे काम वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून वास्तुमांडणी नकाशा व इमारतीचा सविस्तर नकाशा तयार करुन त्यास मंजूरी घेतल्यावरच सुरु करावे.
३. जागा मालकी हक्काबाबतची सर्व कागदपत्रे जोडावीत.
४. विभागाने केलेल्या तरतूदी आहे त्याचप्रमाणे ठेवण्यात याव्यात.

२. सदरच्या प्रस्तावावरील खर्च हा मागणी क्र.झेडई-१, २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (०६) अल्पसंख्यांक वस्तीतील औद्योगिक प्रशिक्षण संस्थांना अनुदान देण्यासाठी सहाय्यक अनुदान,(२२३५ ए १२२) अनुदाने (वेतनेत्तर) या अल्पसंख्याक विभागाच्या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात येईल. या कामासाठी अल्पसंख्याक विभागाकडून टप्प्याटप्प्याने निधी उपलब्ध करुन देण्यात येणार आहे. त्यापैकी २०१०-११ या वर्षात रु.२.०० कोटीचा निधी उपलब्ध करुन देण्यात येईल. सदरच्या कामासाठी सचिव समितीची मान्यता घेण्याची कार्यवाही या विभागामार्फत करण्यांत येईल. मात्र तांत्रिक मान्यता व अनुषांगिक कार्यवाही सार्वजनिक बांधकाम विभागाने करावी. तसेच बांधकाम पूर्ण करण्यासाठी अर्थसंकल्पात संबंधित विभागाने योग्य ती तरतूद केल्याशिवाय तसेच तांत्रिक मान्यतेची कार्यवाही पूर्ण केल्याशिवाय बांधकाम सुरु करु नये.

३. सदरच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने नियोजन विभागाने काही सूचना केल्या आहेत. त्यांही विचारात घेणे आवश्यक आहे.

१) ढोबळ अंदाजपत्रकात प्रस्तावामध्ये पार्कींगची मोठी सोय करण्यांत आलेली आहे. त्याची आवश्यकता तपासण्यांत यावी. (मुंबई शहरामध्ये विद्यार्थी व कर्मचारी हे सार्वजनिक वाहनांचा जास्त वापर करतात.)

२) वर्ग खोल्या दुसऱ्या मजल्यावर ठेवण्याबाबतचा विचार करावा. कारण सर्व विद्यार्थी यांचा वापर करतात.

३) काही ट्रेडचे वर्कशॉप (कार्यशाळा) सातव्या मजल्यावर ठेवण्यांत यावे.

४) प्राचार्यांची कार्यालये व इतर कार्यालये पहिल्या मजल्यावर ठेवण्यांत यावीत.

४. प्रस्तुत आदेश शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक विअप्र.१००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या वित्तीय अधिकार नियम १९७८, भाग पहिला, उपविभाग ५, मधील अनुक्रमांक १ अन्वये सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४, अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदरचा शासन निर्णय हा सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२९२/इमारत-३, दि. २.६.२०१० अन्वये तसेच अल्पसंख्यांक विकास विभागाच्या कार्यासन ८ दिनांक ०८.०७.२०१० च्या अनौपचारिक संदर्भानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय शासनाच्या वेबसाईट वर उपलब्ध असून त्याचा सांकेताक क्रमांक २०१००८११२०१३१६०० असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने,

( सं.अ.बागेश्वर )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत :
संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई-१.
सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई
जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी कार्यालय, मुंबई शहर
प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मांडवी,जि.मुंबई शहर.
महालेखापाल - ॥ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई-१/ नागपूर-२
महालेखापाल - ॥ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई-१/नागपूर-२
जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती,मुंबई शहर.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, वरळी,मुंबई-१८ (नकाशा व अंदाजपत्रकासह) (संचालक (प्रशिक्षण) यांच्यामार्फत
अधिक्षक अभियंता, विशेष प्रकल्प मंडळ, वरळी, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी मुंबई.
सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई
नियोजन/ वित्त/अल्पसंख्यांक विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
निवड नस्ती / व्यशि-२ अर्थसंकल्प.